**परिवहन विभागातील बृहन्मुंबई व मुंबई बाहेरील लिपिक-टंकलेखक संवर्गातील बाह्यस्त्रोत्राद्वारे भरण्यात आलेल्या पदांच्या वेतनाची रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-१०१८/प्र.क्र.२६३/परि-३**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २१ जानेवारी, २०१९

वाचा :-

१) **उद्योग, उर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.काआआ-२०१३/प्र.क्र.२३३/कामगार-८ दि.१८जून,२०१४.**
२) **शासन आदेश क्र.एमव्हीडी-०३१६/प्र.क्र.५४/परि-३, दि.३० जून, २०१६.**
३) **शासन पत्र क्र.एमव्हीडी-०३१६/प्र.क्र.५४/परि-३, दि.२० सप्टेंबर, २०१६.**
४) **परिवहन आयुक्त कार्यालयाचे पत्र क्र.पआका/पुरवणी मागणी/का-१५/२०१८-१९/ जा.क्र.१४८९७, दि.१९ ऑक्टोबर,२०१८ चे पत्र.**
५) **वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पुरक-२०१८/प्र.क्र.१३५/अर्थ-३, दि.५ डिसेंबर, २०१८.**

प्रस्तावना :-

परिवहन विभागातील गट-क संवर्गातील सरळसेवा कोटयातील रिक्त पदे भरण्यास संदर्भीय क्र.२ दि.३० जून, २०१६ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आलेली असून, प्रादेशिक स्तरावरील कार्यालयातील लिपिक-टंकलेखक, सहायक रोखपाल व कर अन्वेषक या संवर्गातील सरळसेवा कोट्यातील ८८ पदे मे.ब्रिस्क इंडिया प्रा.लि.,पुणे व मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा.लि.,मुंबई या बाह्ययंत्रणेद्वारे भरण्याबाबत संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून शासन पत्र दि.२०/९/२०१६ अन्वये मान्यता देण्यात आली. तसेच उक्त दि.१८/६/२०१४ च्या शासन निर्णयास अनुसरून सदर संस्थेव्दारे १७६ लिपिक-टंकलेखक पदे भरण्याबाबत दि.२/८/२०१८ रोजी करारनामा करण्यात आलेला आहे. त्यानुसार लिपिक-टंकलेखक संवर्गातील (८८ + १७६ = २६४) इतकी पदे सदरच्या बाह्ययंत्रणेद्वारे भरण्यात आलेली आहेत. सबब, त्यांच्या वेतनासाठी रु.३.५० कोटी इतक्या रक्कमेच्या पूरक मागणीचा प्रस्ताव परिवहन आयुक्त कार्यालयाने संदर्भीय क्र.४ च्या पत्रान्वये शासनास सादर केला असता, सदर निधी उपलब्ध करून देण्याकरिता “मागणी क्र.बी-३,२०४१, वाहनांवरील कर, ००,००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त,(०१)(०१) आस्थापना-परिवहन आयुक्त (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००१८) -१३- कार्यालयीन खर्च” या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८ च्या हिवाळी अधिवेशानामध्ये सादर करण्यात आला होता. त्यानुसार वित्त विभागाने रु.२.११ कोटी इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर केलेली आहे. वित्त विभागाच्या संदर्भीय क्र.५ वरील दि.५/१२/२०१८ च्या परिपत्रकानुसार महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम, २०१८ (सन २०१८ चा महाराष्ट्र अधिनियम क्र.६३) म्हणून महाराष्ट्र शासन राजपत्र असाधारण, भाग-४, दि.३ डिसेंबर, २०१८ मध्ये

प्रसिध्द करण्यात आल्यामुळे पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या रु.२.११ कोटी निधीपैकी ७०% निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिल्याने तो वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

परिवहन विभागातील प्रादेशिक स्तरावरील कार्यालयात गट-क संवर्गातील लिपिक-टंकलेखक या पदावरील बाह्ययंत्रणेद्वारे (मे.ब्रिस्क इंडिया प्रा.लि.,पुणे व मे.क्रिस्टल इंटिग्रेटेड सर्विसेस प्रा.लि.,मुंबई) नियुक्ती करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतनाच्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी रु.१,४७,७०,०००/-(अक्षरी रुपये एक कोटी सत्तेचाळीस लाख सत्तर हजार फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च "मागणी क्र.बी-३,२०४१, वाहनांवरील कर, ००,००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त,(०१)(०१) आस्थापना-परिवहन आयुक्त (दत्तमत) (अनिवार्य) (२०४१ ००१८) -१३- कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षातर्गत सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

३. उपरोक्त मंजूर करण्यात आलेले अनुदान हे ज्या बाबींसाठी खर्च करण्यास मंजूरी देण्यात आली आहे, त्याच बाबींसाठी खर्च करावे व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४२३/२०१८/व्यय-८ दि.५/१/२०१९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२११४४२२४१४२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arjun Sampat Waghmode

Digitally signed by Arjun Sampat Waghmode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa36f850da37bfbe62486d2bab04146cb40b5662724fae653d0947d157f6450, serialNumber=ae0e4de46520602899a22015dac4a9cedaae6d43ca3fcb9262b2280e43ecfce7, cn=Arjun Sampat Waghmode
Date: 2019.01.22 12:00:41 +05'30'

**(अर्जुन सं.वाघमोडे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
२. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१.
५. वित्त विभाग (व्यय-८ व अर्थ-११) मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवड नस्ती (परि-३).